**मानसिक विकलांग /शारिरीक दुर्बलता असणाऱ्या अपत्याच्या नावाचा समावेश शासकीय कर्मचाऱ्याच्या निवृत्तीवेतन प्रदान आदेशामध्ये करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१८/प्र.क्र.५०/सेवा ४**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०८/१०/२०१८

वाचा : शासन निर्णय, वित्त विभाग क्र.कुनिवे-१०९०/२५४/सेवा-४, दि.०२.०७.१९९१.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम ११६ मध्ये कुटुंब निवृत्तीवेतनाबाबतची तरतुद नमुद केलेली आहे. शासकीय कर्मचाऱ्याच्या व त्याच्या प्रथम वारस (पती/पत्नी) यांच्या मृत्युनंतर त्यांच्या मानसिक विकलांग /शारिरीक दुर्बलता असणाऱ्या अपत्याला हयातभर कुटुंबनिवृत्तीवेतन मिळण्याची तरतुद उपरोक्त नियमामध्ये आहे. सद्याच्या कार्यपध्दतीनुसार शासकीय कर्मचाऱ्याच्या व त्याच्या प्रथम वारस (पती/पत्नी) यांच्या मृत्युनंतर त्यांच्या मानसिक विकलांग /शारिरीक दुर्बलता असणाऱ्या अपत्याचे कुटुंबनिवृत्तीवेतन विषयक प्रकरण मृत शासकीय कर्मचाऱ्याच्या कार्यालयाकडून महालेखापाल कार्यालयाकडे पाठविले जाते व त्यास अनुसरुन महालेखापाल कार्यालयाकडून सुधारीत कुटुंबनिवृत्तीवेतन प्रदान आदेश निर्गमित केले जातात. तथापि, आपल्या शारिरीक व मानसिक अक्षमतेमुळे सदरच्या कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यास असंख्य अडचणी येत आहेत.

अशाच प्रकारच्या अडचणीचा अनुभव केंद्र शासनास आल्यामुळे केंद्र शासनाने त्यांच्या निवृत्ती वेतन नियमांमध्ये सुधारणा करुन निवृत्तीवेतन धारकांच्या हयातीतच अक्षम मुले तसेच अवलंबित माता-पित्यांची नावे निवृत्तीवेतन प्रदान आदेशात समाविष्ट करता येवु शकतील असे आदेश निर्गमित केलेले आहेत. केंद्र शासनाने केलेल्या सुधारणांच्या धर्तीवर अशा प्रकरणाच्या संदर्भात महाराष्ट्र शासनाच्या कुटुंबनिवृत्तीवेतन प्रदान करण्याच्या कार्यपध्दतीमध्ये सुलभीकरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरून शासन आता खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय -

शासकीय कर्मचाऱ्याच्या अपत्यास मानसिक विकलांगता / शारिरीक दुर्बलता असेल व असे अपत्य स्वत:चा उदरनिर्वाह करण्यास असमर्थ असेल तर अशा अपत्यास हयातभर कुटुंबनिवृत्तीवतेन मिळण्याची तरतुद मुळ नियमात आहे. त्या अनुषंगाने शासकीय कर्मचारी ज्यावेळी सेवानिवृत्त होईल त्यावेळी त्याच्या मूळ निवृत्तीवेतन प्रदान आदेशामध्ये त्याच्या मानसिक विकलांग / शारीरिक दुर्बलता असणाऱ्या अपत्याच्या नावाचा समावेश करण्यात यावा.

२. त्याकरिता निवृत्तीवेतन मंजुरी प्राधिकाऱ्याने शासकीय कर्मचाऱ्याचे निवृत्तीवेतनाचे प्रकरण तयार करतानाच नमुना ३ मध्ये “कुटुंबाचा तपशील” मध्ये अशा मानसिक / शारीरिक विकलांगता / दुर्बलता असणाऱ्या अपत्याच्या नावाचा समावेश करावा. अशा अपत्यास, आपली उपजिविका करणे शक्य होणार नाही अशा स्वरुपांचे हे अधूपण आहे, याची खात्री मंजूरी प्राधिकारी करुन घेईल आणि त्यासाठी अशा अपत्याचे मानसिक विकलांगता / शारिरीक दुर्बलतेबाबतचे जिल्हा शल्य चिकित्सकाकडून प्राप्त झालेल्या प्रमाणपत्रावरुन खात्री करुन घेईल. मंजूरी प्राधिकाऱ्याने निवृत्तीवेतन प्रकरणासोबत अशा अपत्याचा फोटो, जिल्हा शल्य चिकित्सकाकडून प्राप्त झालेले प्रमाणपत्र व आवश्यक ती सर्व कागदपत्रे जोडून कर्मचाऱ्याचे निवृत्तीवेतनाचे प्रकरण महालेखापाल कार्यालयाकडे मंजुरीकरिता पाठवावे जेणेकरुन महालेखापाल कार्यालयाकडून सदर शासकीय कर्मचाऱ्याच्या निवृत्तीवेतन प्रदान आदेशामध्येच अशा अपत्याच्या नावाचा समावेश करण्यात येईल.

३. शासकीय कर्मचारी व त्याच्या प्रथम वारस (पती / पत्नी) यांच्या मृत्युनंतर कुटुंबनिवृत्तीवेतनाकरिता पात्र असलेल्या अशा मानसिक विकलांग / शारीरिक दुर्बलता असलेल्या अपत्याच्या पालकाने त्याचे पालकत्व प्रमाणपत्र मृत शासकीय कर्मचाऱ्याच्या कार्यालयाकडे / विभागाकडे सादर करावे.

४. पालकांकडून असे पालकत्व प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतर संबंधित कार्यालयाने / विभागाने हे पालकत्व प्रमाणपत्र कोषागार कार्यालयास सादर केल्यानंतर कोषागार कार्यालये अशा मानसिक विकलांग / शारीरिक दुर्बलता असणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्याच्या अपत्यास कुटुंब निवृत्तीवेतन सुरु करण्याची प्रक्रिया पूर्ण करतील.

५. शासकीय कर्मचाऱ्याच्या मृत्युनंतर मूळ नियमामध्ये तरतूद केलेल्या क्रमानेच वारसांना पात्र असेपर्यंत कुटुंब निवृत्तीवेतन मिळेल व ज्यावेळी मानसिक विकलांग / शारिरीक दुर्बलता असलेले अपत्य क्रमवारीनुसार कुटुंब निवृत्तीवेतनासाठी पात्र होईल त्याचवेळी त्याला संपूर्ण हयातभर कुटुंब निवृत्तीवेतन मिळू शकेल.

६. शासकीय कर्मचाऱ्याच्या मानसिक विकलांग / शारिरीक दुर्बलता असणाऱ्या अपत्याच्या नावाचा समावेश मूळ निवृत्तीवेतन प्रदान आदेशामध्ये (PPO) करण्यात आल्यानंतरही नियमानुसार पालकत्व प्रमाणपत्र व आवश्यक ती चौकशी करण्याची जबाबदारी सध्याच्या प्रचलित पध्दतीप्रमाणेच चालू राहील.

७. जे शासकीय कर्मचारी सदर आदेश निर्गमित होण्यापुर्वीच सेवानिवृत्त झाले असतील व त्यांचे मुळ निवृत्तीवेतन प्रदान आदेश निर्गमित झाले असतील अशा सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या बाबतीत सदर निर्णयास अनुसरुन निवृत्तीवेतन प्रदान आदेश सुधारीत करण्याच्या अनुषंगाने कार्यालय प्रमुखाने आवश्यक ती कार्यवाही करावी. शासकीय कर्मचाऱ्याच्या सेवानिवृत्तीनंतरही कांही कारणास्तव एखाद्या अपत्यास मानसिक विकलांग / शारीरिक दुर्बलता आल्यास अशा अपत्याचा समावेश निवृत्तीवेतन प्रदान आदेशामध्ये

(PPO) करण्यात येईल. संदर्भाधीन शासन निर्णयाद्वारे "सेवानिवृत्तीपूर्वी किंवा सेवेत असतांना मृत्यु होण्यापूर्वी उघडकीस आलेली विकालांगतेची अट" काढून टाकण्यात आल्यामुळे कार्यालय प्रमुखाने अशा प्रकरणांबाबतही उपरोक्त नमूद कार्यवाही पूर्ण करावी.

८. शासन असाही आदेश देत आहे की, ज्यांना निवृत्तीवेतन योजना लागू केलेली आहे अशा मान्यता व अनुदानप्राप्त शैक्षणिक संस्था, कृषितर विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न असलेली अशासकीय महाविद्यालये व कृषी विद्यापीठे यांमधील निवृत्तीवेतनधारक/कुटुंब निवृत्तीवेतनधारक यांना वरील निर्णय, योग्य त्या फेरफारांसह, लागू राहील.

९. महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती अधिनियम, १९६१ (सन १९६२ या महाराष्ट्र अधिनियम क्रमांक पाच) च्या कलम २४८ च्या परंतुकान्वये प्रदान केलेले अधिकार आणि त्यासंबंधातील इतर सर्व अधिकार यांचा वापर करुन शासन असाही आदेश देत आहे की, वरील निर्णय जिल्हा परिषदांचे निवृत्तीवेतनधारक/कुटुंब निवृत्तीवेतनधारक यांनाही लागू राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१००८११४०४६६२०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anudeep Shrinivas Dighe

Digitally signed by Anudeep Shrinivas Dighe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=75f50c6671abf79e06e7d05c1f27cdae17ad6b947f5b0d740fa705320bede741, cn=Anudeep Shrinivas Dighe
Date: 2018.10.08 11:42:59 +05'30'

**(अनुदीप दिघे)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ,
२) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
३) महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई ,
४) महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
६) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई,
७) संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई,

९) उप-मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
१०) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक,
११) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१३) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई
१४) राज्यपालांचे सचिव,
१५) मुख्य मंत्र्यांचे सचिव,
१६) सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
१७) *विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
१८) *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा) मुंबई,
१९) *प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),मुंबई,
२०) *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
२१) *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
२२) मंत्रालयातील सर्व विभाग,
२३) मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
२४) सर्व विभागीय आयुक्त,
२५) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२६) सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
२७) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
२८) शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२९) तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
३०) सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण),
३१) संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई,
३२) सर्व विभागीय शिक्षण उप संचालक,
३३) सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक,
३४) कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर,
३५) कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी,
३६) कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला,
३७) कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी,
३८) कुल सचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर ,
३९) कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे, जिल्हा रायगड,
४०) कुलसचिव, सोलापूर विद्यापीठ, सोलापूर,
४१) बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १
४२) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं. १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईंट , मुंबई २०
४३) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई ४

४४) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई १३.

४५) इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५

४६) नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई २१

४७) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८

४८) वित्त विभागातील सर्व कार्यासने,

४९) निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

*पत्राद्वारे.